**महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी,मुंबई या कार्यालयास सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी कार्यक्रमांतर्गत अनुदान वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : उसाअ-२०१९/प्र.क्र.५/उसाअ/का-५**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- २७/११/२०१९**

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/अर्थसंकल्प -३ दि.२३.७.२०१९.
२) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : : अविवि-२०१९/प्र.क्र.१४/का-७ दि.२३.७.२०१९.
३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : उसाअ-२०१९/प्र.क्र.५/उसाअ/का-५ दि.१२.६.२०१९.
४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : उसाअ-२०१९/प्र.क्र.५/उसाअ/का-५ दि.२६.११.२०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यात उर्दू भाषेचा विकास, संवर्धन, प्रगती तसेच उर्दू व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारिक आदान - प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत विविध कार्यक्रम राबविण्यासाठी वरील संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर अनुदानातून रु.३२,००,०००/-(अक्षरी रूपये बत्तीस लाख फक्त) खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार वर्ष २०१९-२० या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीसाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अनुदानापैकी एप्रिल ते डिसेंबर,२०१९ या ९ महिन्याकरिता आवश्यक असणारे अनुदान वितरीत करण्यास वरील संदर्भ क्र.२ येथील शासन पूरक पत्रकान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यापैकी संदर्भ क्र.३ दि.१२.६.२०१९ अन्वये रुपये ४० लाख निधी वितरित करण्यात आला आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांवरील खर्चाच्या बाबीकरिता सन २०१९-२० मध्ये "मागणी क्र. झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, ०१-अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (२३) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५बी०९४) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या रु.७२,००,०००/-(अक्षरी रुपये बाहत्तर लाख फक्त) अनुदानापैकी ऑगस्ट ते डिसेंबर,२०१९ या ५ महिन्याच्या मर्यादित कालावधीसाठी उर्वरित रक्कम रु. ३२,००,०००/- (अक्षरी रुपये बत्तीस लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई यांनी मंजूर खर्च विहित मर्यादेत राहिल याची दक्षता घ्यावी.

२. अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उपसचिव (आस्थापना) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा ईसीएस (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावाने काढण्यात यावा.

३. उपरोक्त खर्च "मागणी क्र. झेडई-१,२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण,२०० इतर कार्यक्रम, ०१-अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (२३) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ बी ०९४) ३१-सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी,मुंबई यांनी सदर खर्चाचा तपशील व निधीच्या विनियोगाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करणे अनिवार्य राहिल.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, क्रमांक: अंर्थस-२०१९/प्र.क्र.४४/अर्थसंकल्प-३, दि.९.७.२०१९ अन्वये प्राप्त अधिकाराखाली निर्गमित करण्यात येत आहे. या शासन परिपत्रकात नमूद करण्यात आलेल्या सर्व परिच्छेदांची तसेच सदर शासन परिपत्रकांसोबतच्या परिशिष्टातील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात आलेली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच्या संगणक संकेताक २०१९११२७१७१६२१५७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Suhas Madhukar Kshirsagar
Date: 2019.11.27 17:19:28 +05'30'

**( सु.म. क्षीरसागर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १,मुंबई/नागपूर,
२. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अवर सचिव/कक्ष अधिकारी,(का-५) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (का-७)/(का-२) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (२ प्रतीत)
७. खाजगी सचिव, मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
९. अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
१०. प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती (महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.)